**माध्यमिक पुस्तकपेढी योजना**

**सन २०१२-१३, २०१३-१४ व २०१५-१६ मध्ये इ.९ वी व १० वी च्या पात्र लाभार्थ्यांना वाटप केलेल्या पाठ्यपुस्तकांच्या देयकाची थकित रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१६/प्र.क्र.३०५/एस.डी.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १३ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा :** (१) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्रमांक : टीबीके-१३७८/१०६५४५ (३४६)सव्वीस, दिनांक ०४ मे,१९७९.

(२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसं-३, दिनांक २० एप्रिल,२०१६.

(३) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा क्रमांक: पुनर्वि २८१६/(७०/१६)/अर्थसंकल्प, दिनांक २५ जानेवारी, २०१७ चा शासन निर्णय,

(४) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा क्रमांक: अनुवि ४९१६/(३२/१६)/अर्थसंकल्प, दिनांक २५ जानेवारी, २०१७ चा शासन निर्णय,

**प्रस्तावना :**

माध्यमिक पुस्तकपेढी योजना राज्यातील खाजगी तसेच जिल्हा परिषद, महानगरपालिका, नगरपालिका व नगरपरिषदा मार्फत चालविण्यात येणाऱ्या मान्यताप्राप्त व अनुदानप्राप्त माध्यमिक शाळा व शासकीय माध्यमिक शाळांतील विद्यार्थी/विद्यार्थीनींकरीता कार्यान्वित करण्यात आलेली आहे. या योजनेनुसार विद्यार्थी संख्येच्या २५ टक्के मर्यादेत पात्र विद्यार्थ्यांना परतफेडीच्या तत्वावर पाठ्यपुस्तके देण्यात येतात व शैक्षणिक वर्षाअखेर ती परत घेण्यात येतात. नवबौध्द धरुन सर्व अनुसूचित जाती/जमाती, विमुक्त जाती, भटक्या जाती व आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील विद्यार्थी या योजनेचे लाभार्थी आहेत. सदर योजनेखाली दिलेल्या पुस्तकांचा संच दर ३ वर्षांनी बदलून त्याऐवजी नवीन प्रती दिल्या जातात.

२२०२ ३६७३ (योजनेतर) या लेखाशिर्षामधून सन २०१२-१३, २०१३-१४ व सन २०१५-१६ या वर्षासाठी वाटप करण्यात आलेल्या पाठ्यपुस्तकांच्या देयकाची एकूण रु.१,३०,७१,०००/- एवढी थकित रक्कम बालभारतीस देय आहे. सन २०१६-१७ करीता या लेखाशिर्षासाठी रु.१,०००/- एवढीच तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. त्यातून थकित देयकाची रक्कम भागविणे शक्य नसल्याने रु.१,३०,७१,०००/- एवढी रक्कम संदर्भ क्र.(२) येथील दिनांक २५ जानेवारी,२०१७ च्या शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेली आहे. या पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेल्या रकमेतून बालभारतीस थकित देयके अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०१२-१३, २०१३-१४ व सन २०१५-१६ साठी माध्यमिक पुस्तकपेढी योजनेअंतर्गत इयत्ता ९वी व इ. १० वी च्या पात्र लाभार्थ्यांना वाटप करण्यात आलेल्या नवीन पाठ्यपुस्तकांच्या देयकाची एकूण रक्कम रु.१,३०,७१,०००/-(अक्षरी रु.एक कोटी तीस लाख एक्काहत्तर हजार फक्त) बालभारती व संबंधित शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद यांना वटाव रक्कम अदा करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, पुणे यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणाऱ्या निधीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. वित्त विभागाच्या दिनांक २०/०४/२०१६ च्या परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

१) वित्त विभागाच्या दिनांक १७/०४/२०१५ च्या परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.
२) या योजनेसाठी यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५ टक्के पेक्षा अधिक खर्च झाला आहे.
३) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.
४) दिनांक २०/०४/२०१६ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३. सदर बाबीवर होणारा खर्चाचा निधी संदर्भाधीन दिनांक २५ जानेवारी,२०१७ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे या नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपूर्द करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या दिनांक २४/०७/२०१५ व दिनांक २०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सुचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर खर्च "मागणी क्र.ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ०२ माध्यमिक शिक्षण ,११०-खाजगी माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (००) (१३) माध्यमिक शाळांमधील पुस्तक पेढ्या (२२०२ ३६७३) ३१ सहायक अनुदाने योजनेतर योजना" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०२१३१६०५२०९६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.02.13 16:07:57 +05'30'

**( डॉ.सुवर्णा सि.खरात )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत, माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी,**

१. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे,
४. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती),पुणे,
५. कार्यासन अधिकारी, व्यय-६,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
६. कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प-६ कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
७. कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
८. निवड नस्ती एस.डी.४ कार्यासन.